**अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळा करिता मागणी क्रं. ओ-१० मुख्य लेखाशिर्ष “४२५०” अंतर्गत रु.१३०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. अपाम-२०२४/प्र.क्र.११८/का.१४२५-अ**

मंत्रालय विस्तार, कक्ष क्र.६४१,सहावा मजला,
मादाम कामा रोड, राजगुरू हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ जून, २०२४

<u>वाचा</u> : १) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई यांचे पत्र क्र.APAM/ADM/६०/२०२४-२५, दिनांक ३०.०४.२०२४

२) सामान्य प्रशासन विभाग यांची अधिसूचना क्र. शाकानि-२०२१/प्र.क्र.१५५/ १८ (रवका), दि.०९.०९.२०२१.

३) वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थस-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दिनांक ०१ एप्रिल, २०२४.

४) शासन ज्ञापन, नियोजन विभाग क्रं. लेखानु-२०२४/प्र.क्र.१०/का.१४२४, दिनांक २२ एप्रिल, २०२४.

**<u>प्रस्तावना :</u>**

“अण्णासाहेब पाटील आर्थिक विकास मागास महामंडळ” हे राज्यातील आर्थिकदृष्ट्या मागास घटकातील तरुण तरुणींना स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्यासाठी आर्थिक लाभाच्या योजनांची अंमलबजावणी करीत आहे. महामंडळामार्फत सद्यास्थितीत कार्यान्वित असलेल्या योजनांच्या सुयोग्य अंमलबजावणीकरिता व महामंडळामार्फत प्रस्तावित असलेल्या नवीन योजनांच्या अंमलबजावणीकरिता महामंडळाने आर्थिक वर्ष २०२४-२५ वर्षाकरिता महामंडळाच्या योजनांच्या अंमलबजावणी साठी रु. ४००.०० कोटीचा निधी शासनाने अर्थसंकल्पित केला आहे.

या अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु.४००.०० कोटी इतक्या निधीपैकी रु.१३०.०० कोटी निधी BDS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली होती. त्यानुसार वित्त विभागाने महामंडळास रु.१३०.०० कोटी निधी वितरणास मान्यता दिली असून हा निधी “अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळा”स वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

नियोजन विभागाच्या अधिनस्त अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास रु.४००.०० कोटी इतके अनुदान सन २०२४-२५ साठी अर्थसंकल्पित केले आहे. अर्थसंकल्पीत केलेल्या रक्कमेपैकी रु.१३०.०० कोटी इतके निधी वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुषंगाने अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास या शासन निर्णयान्वये रु.१३०.०० कोटी इतका निधी वितरित करण्यात येत आहे. सदरचा होणारा खर्च अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने खालील लेखाशीर्षामधून भागवावा.

मागणी क्र. ओ -१०

लेखाशिर्ष ४२५० इतर सामाजिक सेवा यावरिल भांडवली खर्च

(००) २- (००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका

(०१) (०१) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई

(०२) यास भांडवली अंशदान कार्यक्रम/दत्तमत

(०३) -संगणक सांकेतांक क्रमांक (४२५० अे ०७२) ३२, अंशदाने

२. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास रु.१३०.०० कोटी (रु. एकशे तीस कोटी फक्त) आहरित व संवितरित करण्यासाठी “उप सचिव (१४२५-अ), नियोजन विभाग” हे “नियंत्रक अधिकारी” राहतील, तसेच “कार्यासन अधिकारी (१४२२), नियोजन विभाग” हे “आहरण व संवितरण अधिकारी” असतील. या संदर्भात होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच खर्चाची माहिती वेळोवेळी संबंधित प्रधान महालेखापाल कार्यालयास देण्याची जबाबदारी “नियंत्रक अधिकारी” म्हणून “उप सचिव” (का-१४२५-अ), नियोजन विभाग यांची राहील.

३. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने नमूद उद्दिष्टाकरिता खर्च करण्याची दक्षता घ्यावी.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थस-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ मधील तरतुदींच्या अधीन राहून तसेच वित्त विभागाने अ.नौ.संदर्भ क्रं.३४३/२०२४/व्यय -८, दि.१८.०६.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०६२८१०५४१५०४१६ असा आहे. हा आदेश डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2024.06.28 16:40:53 +05'30'

**( सं.ज.सवने )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय , मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी मुंबई.
७. सह सचिव (कार्यासन व्यय-८ व अर्थ-१६ ), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. उप सचिव ( का.१४११,१४२१,१४२२,१४२३, व १४२४ ), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.
९. कक्ष अधिकारी ( का.१४२४/१४२२), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
११. निवडनस्ती (का.१४२५-अ)